सेवाभरती रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रामार्फत ( सेवायोजन कार्यालये) व प्रसार माध्यमातून प्रसिध्दी देऊन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन.**
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्र:- संकीर्ण -१००३/प्रक्र-९६/२००३/१३-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:-१९ नोव्हेंबर २००३

वाचा:- १) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही१०८०/१२ दि. ७ आक्टोबर,१९८०,
२) शासन निर्णय,शिक्षण व सेवायोजन विभाग,क्र.इएमपी ११८५/५००४७१/(१११)/सेवो-१, दि.१० एप्रिल,१९९१.
३) भारत सरकार, कामगार मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.डीजीई ॲन्डटी-सी-१८०१८/५/९६ -ईई-१, दि.४जुन, १९९८.

**परिपत्रक**

संदर्भाधीन अ.क्र.१ व अ.क्र.२ येथील आदेशान्वये शासकीय, निमशासकीय, महामंडळे,सहकारी संस्था, स्वायत्त संस्था, सार्वजनिक उपक्रम इत्यादींच्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालयांमधील तृतीय व चतुर्थ श्रेणीतील रिक्त पदे सेवा योजन केंद्रामध्ये अधिसूचित करणे आणि रिक्त पदांवरील भरती सेवायोजन कार्यालयाने शिफारस केलेल्या उमेदवारांमधूनच भरणे नियुक्ती प्राधिका-यांवर बंधनकारक असल्याचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील ॲप्लीकेशन क्र. ११६४६/ ११७२४/१९९६ प्रकरणी दि.२२ ऑगस्ट १९९६ रोजी शासकीय, निमशासकीय किंवा खाजगी आस्थापनेत रिक्त पदे भरण्याबाबतच्या कार्यपध्दती संबंधी खालील प्रमाणे सूचना दिल्या आहेत:-

" It should be mandatory for the requisitioning authority/establishment to intimate the employment exchange and employment exchange should sponsor the names of the candidates to the requisitioning departments for selection strictly according to seniority and reservation as per requisition. In addition, the appropriate department or undertaking or establishment, should call for the names by publication in the newspapers having wider circulation and also display on their office notice boards or announce on radio, television and employment news bulletins and then consider the cases of all the candidates who have applied "

३. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त सूचनांनुसार असे आदेश देण्यात येत आहेत की, शासकीय/ निम शासकीय कार्यालये, महामंडळे, सहकारी संस्था, स्वायत्त संस्था, सार्वजनिक उपक्रम इ. च्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालयांमधील रिक्त पदे भरताना (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेत येणारी पदे वगळून) रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्राकडून (सेवायोजन कार्यालये ) ज्येष्ठतेनुसार

यादी प्राप्त करुन घेण्यात यावी. त्याचबरोबर रिक्त पदांबाबतची जाहिरात सर्व प्रसार माध्यमांतून (वर्तमानपत्रातील जाहिरातीद्वारे, दुरदर्शन, रेडिओ,नोटीस बोर्ड इ.) प्रसिध्दी देऊन अर्ज मागविण्यात यावेत व वरील दोन्ही प्रकारे प्राप्त होणा-या याद्यांमधून / अर्जांमधून पात्र उमेदवारांची विहित पध्दतीनुसार निवड करण्यात यावी.

४. सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील आदेश त्यांच्या प्रशासकीय अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना / नियुक्ती प्राधिका-यांना कळवावेत आणि या आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी केली जाईल याबाबत दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(चारुशीला सोहोनी)
प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,राजभवन, मुंबई.
मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
रोजगार व स्वयंरोजगार विभाग /रोस्वरो-१ (१० प्रती)
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
* पत्राने

---